सन २०१४-१५ करिता वनक्षेत्रात पर्यटन विकास (राज्य योजना )योजनेतर्गंत विकास कामांचा नविन बाब प्रस्ताव (२४०६ २२८६)

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.निसप्र-२०१४/प्र.क्र.१७६/फ-५**
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ५ मार्च २०१५.

**वाचा -** १. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य,नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष -१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२८(१४-१५)/१९१७/१४-१५, दि.९.०२.२०१५. व दि.५.०३.२०१५

२. मुख्य वन संरक्षक (प्रा.) चंद्रपुर यांचे पत्र क्र. कक्ष -२/योजना/१४-१५ /१९७९/ दि.३०.०१.२०१५.

३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र..अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प -३, दि.९.०२.२०१५

**प्रस्तावना :-**

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये राज्य योजना २०१४-१५ करीता पर्यटनस्थळाचा विकास (२४०६-२२८६) अतर्गंत चिचपल्ली वन परिक्षेत्राअंतर्गत झोपला मारोती देवस्थान टेमगा गाव अजयपुर जि.चंद्रपुर पर्यंटन स्थळाचा विकास करण्यासाठी व व पर्यटकांना आकर्षित करण्यासाठी आवश्यक सुविधा निर्माण करण्यासाठी एकुण रू. १०३.०० लक्षचा नवीन बाब प्रस्ताव सादर केला आहे.सदरहू नविन बाब प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी प्रस्तावित केल्यानुसार चिचपल्ली वन परिक्षेत्राअंतर्गत झोपला मारोती देवस्थान टेमगा गाव अजयपुर जि.चंद्रपुर या पर्यंटन स्थळांचा विकास करण्यासाठी खालील विवरणपत्रामध्ये नमुद केल्यानुसार बाब निहाय खर्च करण्यासाठी एकुण रू. ७८.७५ लक्ष (रूपये अठ्याहत्तर लाख पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या रक्कमेस शासन मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

(रक्कम रू.लाखात)

| अ.क्र. | कामाचा तपशिल | बाब निहाय रक्कम |
|---|---|---|
| १ | अंधारी नदीच्या काठावर कठडे / कुंपण घालणे | रू.१०.०० |
| २ | प्रवेशव्दार बांधणे | रू.५.०० |
| ३ | निसर्ग पायवाट तयार करणे | रू.५.०० |
| ४ | निरीक्षण मनोरे बांधणे | रू.४.०० |
| ५ | सोलर स्ट्रीट लाईट लावणे | रू.१०.०० |
| ६ | सिमेंट बाकडे खरदी करणे | रू.२.०० |
| ७ | कुंड्या खरेदी करणे व त्यात झाडे लावणे | रू.०.५० |
| ८ | रोपे लावणे / बांबु सेटम /संवर्धन करणे /रांझीची साफसफाई करणे | रू.५.०० |
| ९ | प्रसिद्धी फलक /जनजागृती फलक लावणे | रू.१.७५ |
| १० | कचरा कुंडी खरेदी करणे | रू.०.५० |
| ११ | बॅरीअर गेट लावणे | रू.०.५० |
| १२ | संयुक्त वनव्यवस्थापन समिती यांना भांडे /साहीत्य खरेदी | रू.३.०० |
| १३ | वनसंरक्षक कुटी तयार करणे | रू.३.०० |
| १४ | साहसी खेळाचे साहीत्य खरेदी करणे | रू.१५.०० |
| १५ | संरक्षक कुटी लावणे ( Puff pannel) | रू.४.५० |
| १६ | माहिती केंद्र लावणे ( Puff pannel) | रू.९.०० |
| १८ | एकुण | रू.७८.७५ |

उपरोक्त खर्च विहीत कार्यपद्धतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पुर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

सदरहू निधी सन २०१४-१५ साठी मागणी क्रमांक सी -७,२४०६ वनीकरण व वन्य जीवन राज्य योजनातर्गंत योजना (०२)(०५) वनक्षेत्रामध्ये पर्यटन विकास कार्यक्रम (राज्य) (२४०६ २२८६) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.तसेच वन (संवर्धन) कायदा १९८० चा भंग होणार नाही याची सुद्धा काळजी घ्यावी.

सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प - ३ दि.९.०२.२०१५अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०५१६१५२३१७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.03.05 16:24:50 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपुर
२) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य नागपुर
३) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
४) मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) चंद्रपुर .
५) महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
६) कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
७) ब-१/फ-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
८) निवड नस्ती (फ-५)